वार्षिक योजना सन २०१८-१९ करिता राज्य योजनेतंर्गत वनविभागाचे संगणकीकरण करणेस्तव पुरवणी मागणीचा प्रस्ताव (२४०६ ८६६९).

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

**शासन निर्णय क्रमांक : एफएलडी-२०१८/प्र.क्र.२५४/फ-१०**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक :- २४/०१/२०१९**

**वाचा** :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१२ (८६६९)/२०१८-१९/१४६, दिनांक ०२/०५/२०१८.

३) शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१८/प्र.क्र.४६/फ-२, दिनांक ०७/०५/२०१८.

४) शासन निर्णय क्र.पुरवणी-२०१८/प्र.क्र.१७४/ब-१, दिनांक ३१/०७/२०१८.

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१२(८६६९)/२०१८-१९/८६०, दिनांक १६/०८/२०१८ व पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१२(८६६९)/२०१८-१९/१८१०, दिनांक १०/०१/२०१९.

**प्रस्तावना :-**

वार्षिक योजना सन २०१८-१९ करिता “वनविभागाचे संगणकीकरण” (२४०६ ८६६९) या योजनेकरीता मूळ अर्थसंकल्पात एकूण रु.१०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये एकूण रु.१०००.०० लक्ष चालू/ नवीन बाब प्रस्ताव शासनास सादर केला होता व त्यानुषंगाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये ७० % च्या मर्यादेत एकूण रु.७००.०० लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात आली होती.

सन २०१८-१९ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे वन विभागाचे संगणकीकरण करणे (२४०६ ८६६९) या योजनेकरीता एकूण रु.२३३.४२ लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रांन्वये पुरवणी मागणीव्दारे मंजूर रु.२३३.४२ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाने संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकानुसार एकूण रु.२३३.४२ लक्ष पैकी ७०% च्या मर्यादेत निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे व त्यानुषंगाने सदरची रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वार्षिक योजना सन २०१८-१९ करिता राज्य योजनेतंर्गत वनविभागाचे संगणकीकरण करणेस्तव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विभाग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये सादर केलेल्या चालू/ नवीन बाब प्रस्तावातील नमूद कामांकरिता पुरवणी मागणीव्दारे मंजूर झालेल्या एकूण रु.२३३.४२ लक्ष पैकी ७०% म्हणजेच १६३.३९४ लक्ष - (२८- व्यवसायिक सेवा रु.२४.५०९१ लक्ष, ५०- इतर खर्च रु.१३८.८८४९ लक्ष) इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. सदर योजनेकरीता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथे नमूद दिनांक ०२/०४/२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखील दक्षता घ्यावी. तसेच वन विभागाचे संगणकीकरण करणे या योजनांकरीता वेळोवेळी निर्गमित केलेल्या धोरणात्मक शासन निर्णयांमधील अटी व शर्तींची पूर्तता केली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर योजनेवर होणारा खर्च महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक:- सी-७, प्रधान लेखाशिर्ष :- २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना, (१७) वन विभागाचे संगणकीकरण, (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण (५० - इतर खर्च), (२४०६ ८६६९) या लेखा शिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३८६/व्यय-१०, दिनांक १८/०१/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२४१७३११७६६१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.01.24 17:39:39 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
७) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
८) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
९) कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
१०) निवडनस्ती, कार्यासन फ-१०